**सिंधुदुर्ग व चंद्रपूर जिल्ह्यांमध्ये रिसोर्स बेस्ड डेव्हलपमेंट च्या दृष्टीने आराखडा तयार करण्यासाठी उच्चस्तरीय समिती स्थापन करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः डिएपी-१०१५/प्र.क्र.५१/का.१४८१**

मंत्रालय, मुंबई . ४०० ०३२,
दिनांक: २० ऑगस्ट, २०१५

**प्रस्तावना**

"महाराष्ट्राच्या दोन टोकांवरील चंद्रपूर व सिंधुदुर्ग हे खनिज व नैसर्गिक संपत्तीचे वरदान लाभलेले जिल्हे आहेत. या नैसर्गिक साधनसंपत्तीचा इष्टतम वापर व्हावा यासाठी सधन नियोजन व अंमलबजावणीचा विशेष कार्यक्रम राबविण्यात येईल" या मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांच्या सन २०१५-१६ या वर्षाच्या अर्थसंकल्पिय भाषणातील अ.क्र.४५ येथील मुद्याच्या अनुषंगाने या दोन्ही जिल्ह्यातील वनसंपत्ती, पर्यटन, मत्स्य उत्पादन, फलोत्पादन इ. उपलब्ध साधन संपत्तीवर आधारित उद्योग, रोजगार, कृषि, मत्स्य संवर्धन, पशु संवर्धन, प्रक्रिया उद्योग, पर्यटन, वनउपज आधारित उद्योग, महिला गट सक्षमीकरण, कौशल्यवृध्दी कार्यक्रमांतर्गत रोजगार निर्मिती अशा जिल्ह्यातील सर्व योजना/कार्यक्रमांची सांगड घालून जिल्ह्याच्या विकासाचे मॉडेल तयार करणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय**

चंद्रपूर व सिंधुदूर्ग जिल्ह्यामधील साधनसंपत्तीचे परिणामकारक नियोजन करुन जिल्ह्याचा सर्वकष विकास करण्याच्या दृष्टीने खालील प्रमाणे विकास क्षेत्र निवडण्यात येत आहेत :-

१.पर्यटन

२.फलोत्पादन

३. जलसंधारणाचे विविध उपचार राबविणे (उदा. सिमेंट नाला बांध, कोकण कृषि विद्यापीठाने विकसित केलेल्या टायरपासून बांधावयाचे बांध, इ.)

४.उद्योग व खनिज

५.ग्रामविकास व दारिद्र्य निर्मुलन

६.कृषि, मत्स्योद्योग व संलग्न

७.वन व वनोत्पादन पदार्थ/ वस्तू

२. वरील विकास क्षेत्रांसाठी यथार्थदर्शी योजना (Perspective Plan) तयार करावयाची असून त्यासाठी खालील प्रमाणे उच्चस्तरीय समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १.मा. राज्यमंत्री (नियोजन व वित्त) | -- | अध्यक्ष |
| २.अपर मुख्य सचिव (परिवहन) | -- | सदस्य |
| ३.अपर मुख्य सचिव (कृषि) | -- | सदस्य |
| ४.अपर मुख्य सचिव (वित्त) | -- | सदस्य |
| ५.अपर मुख्य सचिव (नियोजन) | -- | सदस्य |
| ६.प्रधान सचिव (पर्यावरण) | -- | सदस्य |
| ७.प्रधान सचिव (ग्रामविकास) | -- | सदस्य |

८.सचिव (उद्योग) -- सदस्य
९.सचिव (पर्यटन) -- सदस्य
१०.सचिव (वने) -- सदस्य
११.सचिव (जलसंधारण व रोहयो) -- सदस्य
१२.सचिव (रस्ते) -- सदस्य
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी (मेरीटाईम बोर्ड) -- सदस्य
१४.संचालक, महाराष्ट्र रिमोट सेन्सींग ॲप्लिकेशन सेंटर, नागपूर -- सदस्य
१५.जिल्हाधिकारी, सिंधुदूर्ग -- सदस्य
१६.जिल्हाधिकारी, चंद्रपूर -- सदस्य
१७.मुख्य कार्यकारी अधिकारी, राष्ट्रीय ग्रामिण जीवनोन्नती अभियान -- सदस्य सचिव

३. वरील प्रमाणे यथार्थदर्शी योजना (Perspective Plan) तयार करण्यासाठी (१) श्री.जी.जी. सोहनी, अध्यक्ष , BAIF, जी.जी. भवन, देसाई नगर,पुणे, (२) डॉ.भरुचा,माजी अध्यक्ष, जैव विविधता मंडळ तथा विभाग प्रमुख,जैव विविधता विभाग,भारती विद्यापीठ, पुणे, (३) श्री. जगदाळे, प्रमुख, विज्ञान व तंत्रज्ञान पार्क, केंद्र शासन तथा सदस्य सचिव, राज्यस्तरीय नाविन्यता मंडळ व (४) श्री. बाळासाहेब दराडे, माजी शास्त्रज्ञ, नासा, बुलढाणा या तज्ज्ञांचा आणि आवश्यकते नुसार कृषि,मत्स्योद्योग, खनिज व पर्यटन क्षेत्राशी निगडीत तज्ज्ञांचा “विशेष निमंत्रित” म्हणून उपरोक्त समितीमध्ये समावेश करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर विशेष निमंत्रितांना उपरोक्त समितीच्या बैठकांना बोलाविण्याचा अधिकार सदरहु उच्चस्तरीय समितीस राहील.

४. तसेच यथार्थदर्शी योजना (**Perspective Plan)** तयार करण्यासाठी आवश्यकतेनुसार कोकण कृषि विद्यापिठ, खाजगी उद्योगांचे प्रतिनिधी, संबंधित क्षेत्रांमधील तज्ज्ञ, स्थानिक अभ्यास गट, महाराष्ट्र रिमोट सेंन्सींग ॲप्लीकेशन सेंटर, यांच्या सहभागाने विकासक्षेत्र निहाय स्टडी ग्रुप तयार करून विकासक्षेत्र निहाय मॉडेल तयार करण्यात येईल व त्यांना आवश्यकतेनुसार समितीच्या बैठकांमध्ये आमंत्रित करण्यात येईल. तसेच सदर विकासक्षेत्रांमध्ये या पूर्वी अभ्यास झाला असल्यास, आवश्यकतेनुसार त्यांच्या अहवालाचा देखील नियोजन करताना विचार करण्यात येईल.

५. सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी राज्यस्तरावर मुख्य कार्यकारी अधिकारी, राष्ट्रीय ग्रामिण जीवनोन्नती अभियान यांच्या अधिपत्याखाली एक स्वतंत्र कक्ष (Cell) स्थापन करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

<u>समितीची कार्यकक्षा</u>-:

१) चंद्रपूर व सिंधुदुर्ग जिल्हयाच्या विकासासाठी आवश्यक असलेल्या योजना/कार्यक्रमांची सांगड घालून व विविध विभागाकडील उपलब्ध माहितीच्या आधारे स्टडी ग्रुपने तयार केलेल्या अहवालाची छाननी/ अभ्यास करुन क्षेत्रनिहाय यथार्थदर्शी योजना (Perspective Plan) तयार करुन ती शिफारशीसह शासनास सादर करणे.

(२) विविध योजनांचे कन्व्हेजन्स (एक केंद्रभिमूखता) करुन त्याद्वारे आवश्यक असलेल्या निधीची शिफारस करणे.

(३) यथार्थदर्शी योजना (Perspective Plan) तयार करण्यासाठी अवलंबविण्यात येणारी कार्यपद्धती निश्चित करणे.

६. उपरोक्त समितीने चंद्रपूर व सिंधुदूर्ग जिल्ह्यांसाठी वरील नमूद विकास क्षेत्रनिहाय यथार्थदर्शी योजना अंतिम करुन ती शासनास या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांत सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२०१४१०४७४८१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Vasantrao Wahul

Digitally signed by Kirankumar Vasantrao Wahul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Vasantrao Wahul
Date: 2015.08.20 17:35:18 +05'30'

**(कि. व. वाहुल)**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१.मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,
२.मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,
३.शासनाचे मुख्य सचिव,
४.शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
५.विभागीय आयुक्त, कोकण विभाग,नागपूर विभाग
६.जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग आणि चंद्रपूर
७.मुख्य कार्यकारी अधिकारी, सिंधुदुर्ग आणि चंद्रपूर
८.श्री.जी.जी.सोहनी, अध्यक्ष, BAIF,जी.जी.भवन, देसाई नगर, पुणे.
९.डॉ.इ.भरुचा, माजी अध्यक्ष, जैव विविधता मंडळ तथा विभाग प्रमुख, जैव विविधता विभाग, भारती विद्यापीठ, पुणे
१०.श्री. राजेंद्र जगदाळे, प्रमुख, विज्ञान व तंत्रज्ञान पार्क, गणेशखिंड, पुणे तथा सदस्य सचिव, राज्यस्तरीय नाविन्यता मंडळ.
११.श्री.बाळासाहेब दराडे,माजी शास्त्रज्ञ, नासा, जिल्हा परिषद सदस्य, जिल्हा परिषद, बुलढाणा.
१२.उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग,नागपूर विभाग.
१३.जिल्हा नियोजन अधिकारी, सिंधुदुर्ग आणि चंद्रपूर
१४.नियोजन विभागातील सर्व सह सचिव/ उप सचिव
१५.निवड नस्ती (का.१४८१), नियोजन विभाग.